बालविकास प्रकल्प अधिकारी, सामान्य राज्य सेवा, गट-अ परीक्षा दि. 06 जुलै 2014



**2014**

CODE : **SO4**

प्रश्नपुस्तिका क्रमांक
**BOOKLET NO.**

**प्रश्नपुस्तिका**

**चाळणी परीक्षा/SCREENING TEST**

**वेळ : 1 (एक) तास**

**एकूण प्रश्न : 100**
**एकूण गुण : 100**

# सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत 100 अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

| परीक्षा-क्रमांक | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | ↑ केंद्राची संकेताक्षरे | | | | | | ↑ शेवटचा अंक | |

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) (अ) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(ब) **आयोगाने ज्या विषयासाठी मराठी बरोबर इंग्रजी माध्यम विहित केलेले आहे. त्या विषयाचा प्रत्येक प्रश्न मराठी बरोबर इंग्रजी भाषेत देखील छापण्यात आला आहे. त्यामधील इंग्रजीतील किंवा मराठीतील प्रश्नामध्ये मुद्रणदोषांमुळे अथवा अन्य कारणांमुळे विसंगती निर्माण झाल्याची शंका आल्यास, उमेदवाराने संबंधित प्रश्न पर्यायी भाषेतील प्रश्नाशी ताडून पहावा.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची दिलेल्या चार पर्यायापैकी सर्वात योग्य उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरूद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**

पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये

SEAL

1. माहिती अधिकार अधिनियम 2005 नुसार खालीलपैकी कोणते अधिकार राज्य माहिती आयोगाला विहित नसतात ?
   (1) व्यक्तीस समन्स काढणे व उपस्थित राहण्यास भाग पाडणे.
   (2) शपथ पत्रावर पुरावा घेणे.
   (3) आरोपीस अटक करणे.
   (4) वरील पैकी कोणतेच नाही.

---

2. खालील वाक्ये वाचा :
   (a) खाजगी आयुष्य हा भारतीय राज्य घटनेच्या अनुच्छेद 21 मधील मुलभूत अधिकाराचाच एक भाग आहे.
   (b) खाजगी माहिती देणे माहिती अधिकार अधिनियम 2005 च्या कलम 8 मध्ये प्रतिबंधीत केले आहे.

   **पर्यायी उत्तरे :**
   (1) वाक्य (a) चूक असून वाक्य (b) हे बरोबर आहे.
   (2) वाक्य (a) बरोबर असून वाक्य (b) हे चूक आहे.
   (3) वाक्य (a) व (b) बरोबर आहेत.
   (4) वाक्य (a) व (b) चूक आहेत.

---

3. IPv4 अन्वये खालीलपैकी कोणता Class (वर्गवारी) Multicasting साठी वापरला जातो ?
   (1) Class B (2) Class C (3) Class D (4) Class E

---

4. IPv4 Addressing प्रमाणे, Class-B वर्गवारी मध्ये, पहिल्या भागात (First Octet) पुढीलपैकी कुठचे क्रमांक असु शकतात ?
   (1) 1-127 (2) 128-191 (3) 224-239 (4) 192-223

---

5. OSI model संरचनेमध्ये खालीलपैकी कोणता layer समाविष्ट नाही ?
   (1) फिजिकल लेयर (Physical layer)
   (2) इंटरनेट लेयर (Internet layer)
   (3) नेटवर्क लेयर (Network layer)
   (4) ट्रान्सपोर्ट लेयर (Transport layer)

---

**कच्च्या कामासाठी जागा**

6. दिल्लीच्या मल्टीमोडल ट्रान्सपोर्ट सिस्टीम ने (DIMTS) महिलांच्या सुरक्षिततेसाठी मोबाईल फोनवर वापरता येणारे '________' हे नवीन सुरक्षा साधन तयार केले आहे.

(1) टेलटेल (2) इन् डेंजर (3) हेल्प मी (4) ट्रॅक मी

7. खालील जोड्या लावा :

| | (a) | | (b) |
|---|---|---|---|
| (a) | राष्ट्रीय तंत्रज्ञान दिन | (i) | 27 सप्टेंबर |
| (b) | आंतरराष्ट्रीय युवा दिन | (ii) | 12 ऑगस्ट |
| (c) | जागतिक पर्यटन दिन | (iii) | 07 एप्रिल |
| (d) | जागतिक आरोग्य दिन | (iv) | 11 मे |

**पर्यायी उत्तरे :**

| | (a) | (b) | (c) | (d) |
|---|---|---|---|---|
| (1) | (iv) | (ii) | (i) | (iii) |
| (2) | (iii) | (i) | (ii) | (iv) |
| (3) | (ii) | (iii) | (iv) | (i) |
| (4) | (i) | (iv) | (iii) | (ii) |

8. भारतात सर्वाधिक बालकामगार ________ या राज्यात असून सर्वात कमी ________ राज्यात आहेत.

(1) ओडिसा - महाराष्ट्र (2) महाराष्ट्र - गुजरात

(3) आंध्र प्रदेश - केरळ (4) केरळ - आंध्र प्रदेश

9. 2011-12 हे वर्ष पर्यटन वर्ष म्हणून साजरे करताना महाराष्ट्र सरकारने खालीलपैकी कोणते घोष वाक्य वापरले ?

(1) आपला महाराष्ट्र (2) असीम महाराष्ट्र

(3) आमचा महाराष्ट्र (4) अलौकिक महाराष्ट्र

10. 2 जानेवारी 2014 रोजी भारताने ________ या देशाबरोबर कामगार सहकार्य करारावर सह्या केल्या ज्याचा फायदा गल्फ देशात काम करणाऱ्या 28 लक्ष कामगारांना होईल.

(1) संयुक्त अरब अमिराती (2) कुवेत

(3) सौदी अरेबिया (4) कतार

**कच्च्या कामासाठी जागा**

11. जगातील लोहमार्गावरील लांब बोगद्यासंदर्भात खालील जोड्या जुळवा :

| बोगदा | | देश | |
|---|---|---|---|
| (a) | सैकान | (i) | स्पेन |
| (b) | चॅनल | (ii) | फ्रान्स |
| (c) | सेउल सबवे | (iii) | जपान |
| (d) | माद्रीद मेट्रो | (iv) | दक्षिण कोरीया |

**पर्यायी उत्तरे :**

| | (a) | (b) | (c) | (d) |
|---|---|---|---|---|
| (1) | (i) | (ii) | (iii) | (iv) |
| (2) | (iii) | (ii) | (iv) | (i) |
| (3) | (ii) | (iii) | (i) | (iv) |
| (4) | (iv) | (i) | (ii) | (iii) |

---

12. खालील विधाने विचारात घ्या :

(a) युनेस्कोने जागतिक वारसा म्हणून मान्यता दिलेल्या पश्चिम घाटातील 39 स्थळांपैकी सर्वाधिक स्थळे केरळमध्ये तर सर्वात कमी स्थळे महाराष्ट्रात आहेत.

(b) महाराष्ट्रातील कोयना, चांदोली, राधानगरी आणि कास पठार ही चार ठिकाणे या यादीत समाविष्ट आहेत.

वरीलपैकी कोणते/ती विधान/ने **बरोबर** आहे/त ?

(1) फक्त (a) (2) फक्त (b) (3) (a) आणि (b) (4) यापैकी नाही

---

13. खालील विधाने विचारात घ्या :

(a) 2009 मध्ये भारतीय अंतराळ संशोधन संस्थेने (इस्रो) ''भुवन'' प्रणालीची निर्मिती केली.

(b) जमीन, पाण्याचे स्रोत इ. विषयीची माहिती या प्रणालीमध्ये टुडी आणि थ्रीडी स्वरूपात उपलब्ध आहे.

(c) या प्रणालीचा 'रस्ता मार्गदर्शक' म्हणून उपयोग करता येतो.

वरीलपैकी कोणते/ती विधान/ने **बरोबर** आहे/त ?

(1) फक्त (a) (2) (a) आणि (b)

(3) (b) आणि (c) (4) (a), (b) आणि (c)

---

**कच्च्या कामासाठी जागा**

14. खालील विवरणावरून व्यक्ती ओळखा :

(a) विज्ञाननिष्ठ समाजसुधारक म्हणून त्यांची ख्याती होती.

(b) त्यांना शिवछत्रपती क्रीडा पुरस्काराने सन्मानित करण्यात आले होते.

(c) सामाजिक कृतज्ञता निधीचे ते संस्थापक सदस्य होते.

(d) साधना साप्ताहिकाचे ते संपादक होते.

(e) अंधश्रद्धा निर्मूलनाच्या कार्यासाठी त्यांनी आपले जीवन वेचले.

**पर्यायी उत्तरे :**

(1) डॉ. देवदत्त दाभोलकर (2) डॉ. नरेंद्र दाभोलकर

(3) डॉ. श्याम मानव (4) डॉ. दत्तप्रसाद दाभोलकर

---

15. खालील विधाने विचारात घ्या :

(a) 2011 च्या जनगणना अहवालानुसार भारतातील शहरीकरणाचे प्रमाण 31.16% आहे.

(b) गोवा राज्यातील निम्म्यापेक्षा जास्त लोक शहरांमध्ये राहतात.

(c) मिझोराम हे शहरी लोकसंख्या जास्त असलेले देशातील दुसऱ्या क्रमांकाचे राज्य आहे.

(d) शहरीकरणाच्या संदर्भात महाराष्ट्राचा संपूर्ण देशात पहिला क्रमांक लागतो.

वरीलपैकी कोणती विधाने **बरोबर** आहेत ?

(1) (a) आणि (b) (2) (b) आणि (c)

(3) (a), (b) आणि (d) (4) (a), (b) आणि (c)

---

16. दिलेल्या आकृत्यांच्या मालिकेत प्रश्न चिन्हांच्या ठिकाणी क्रमाने येणाऱ्या आकृत्यांचा गट निवडा.

✶ _?_ ○ △ △ □ ○ _?_ ✶ □ ○ △ _?_ □ ○ ✶

(1) □ △ ✶ (2) □ ✶ △ (3) △ □ ✶ (4) □ □ ✶

---

17. दिलेल्या संख्यामालेतील, प्रश्नार्थक चिन्हाच्या ठिकाणी येणारी संख्या दिलेल्या पर्यायांमधून निवडा.

0, 3, 8, 15, _?_ , 35, 48.

(1) 24 (2) 20 (3) 18 (4) 22

---

**कच्च्या कामासाठी जागा**

18. जर 7⊕404 – 6 □ * = 77777 असेल तर '⊕' साठी कोणता अंक असेल ?

(1) 3 (2) 8 (3) 9 (4) 5

---

19. दिलेल्या आकृतीत प्रश्नार्थक चिन्हाच्या ठिकाणी योग्य पर्याय निवडा.




(1) 84 (2) 88 (3) 89 (4) 65

---

20. दिलेल्या अक्षर मालिकेत प्रश्नार्थक चिन्हाच्या ठिकाणी कोणते अक्षर येईल ?

B, G, K, __?__ , P, Q.

(1) L (2) M (3) N (4) O

---

21. 2003 च्या भारतीय वैद्यकीय संशोधन मंडळ यांनी केलेल्या सर्वेक्षणानूसार भारतातील ________ टक्के किशोरवयीन मुली स्तनक्षयाने पिडीत आहेत.

(1) 70 (2) 60 (3) 50 (4) 55

---

22. मुलांच्या विकासाच्या सामान्य तत्वांमध्ये खालील कोणत्या तत्वांचा समावेश होतो ?

(a) विकासाचा समान क्रम व आकृतीबंध असेतो.

(b) 5 वर्षापर्यंत मुलांचा विकास पूर्ण होतो.

(c) विकासाची गती एकसारखी असते.

(d) विकासाचे पूर्वकथन करता येते.

**पर्याय :**

(1) (a) व (c) (2) (b) व (c) (3) (a) व (d) (4) (c) व (d)

---

**कच्च्या कामासाठी जागा**

23. मुलांमध्ये देण्यात येणाऱ्या लसीकरण वेळापत्रकात महिने व लस यांची जुळणी करा.

| महिने | | लस | |
|---|---|---|---|
| (a) | 15 ते 18 महिने | (i) | त्रिगुणी व पोलीओ लस |
| (b) | 18 ते 24 महिने | (ii) | बी.सी.जी. |
| (c) | 9 महिने पूर्ण | (iii) | एम.एम. आर. |
| (d) | 1 महिन्या नंतर | (iv) | गोवर |

**पर्यायी उत्तरे :**

| | **(a)** | **(b)** | **(c)** | **(d)** |
|---|---|---|---|---|
| (1) | (iii) | (i) | (iv) | (ii) |
| (2) | (iv) | (ii) | (i) | (iii) |
| (3) | (ii) | (iv) | (iii) | (i) |
| (4) | (i) | (ii) | (iv) | (iii) |

---

24. प्रधानमंत्री स्वास्थ सुरक्षा योजना (2006) कोणत्या उद्देश्याने सुरू केली गेली ?

(a) स्वास्थ सुविधासाठी

(b) बाल स्वास्थ सुधारणासाठी

(c) स्वास्थ सुविधाची राष्ट्रीय समानतेसाठी

(d) स्वस्त दरात वैद्यकीय सुविधा उपलब्ध करण्यासाठी

**पर्यायी उत्तरे :**

(1) (a) आणि (b)  (2) (b) आणि (c)

(3) (c) आणि (d)  (4) (b) आणि (d)

---

25. मधुमेहाचे खालीलपैकी प्रमुख लक्षण कोणते ?

(1) सतत तहान लागणे  (2) थकवा  (3) उलट्या होणे  (4) डोके दुखी

---

26. शाळेत जाणाऱ्या मुलांसाठी शालेय उपहार कार्यक्रम मद्रास येथे कधी सुरू झाला ?

(1) 1920  (2) 1925  (3) 1930  (4) 1935

---

**कच्च्या कामासाठी जागा**

27. मुलांच्या संपूर्ण शारीरिक विकासापैकी किती % विकास पहिल्या 5-6 वर्षात होतो ?
खालील पर्यायापैकी **योग्य** पर्याय निवडा.

(1) 75% (2) 40% (3) 80% (4) 95%

---

28. एकात्मिक बाल विकास सेवा योजनांमधील लाभार्थी व सेवांची योग्य जुळणी करा :

| | **लाभार्थी** | | **सेवा** |
|---|---|---|---|
| (a) | 15 ते 45 वयोगट | (i) | आहार व आरोग्य शिक्षण |
| (b) | गर्भवती माता | (ii) | लसीकरण |
| (c) | स्तनदा माता | (iii) | टिटॅनस लस देणे |
| (d) | 1 वर्षाखालील मुले | (iv) | पूरक पोषण आहार |

**पर्यायी उत्तरे :**

| | **(a)** | **(b)** | **(c)** | **(d)** |
|---|---|---|---|---|
| (1) | (iii) | (ii) | (i) | (iv) |
| (2) | (i) | (iii) | (iv) | (ii) |
| (3) | (iv) | (i) | (iii) | (ii) |
| (4) | (ii) | (iv) | (i) | (iii) |

---

29. योग्य कथन ओळखा :

(a) ज्या नवजात बालकाचे वजन 5 पौंड असते त्याला पूढे बऱ्याच समस्यांना तोंड द्यावे लागतेच.

(b) ज्या मातेच्या गर्भामध्ये वजनाने मोठ्या मुली असतात तिच्या बाबतीत अपरिपक्व बालकांच्या जन्माची शक्यता जास्त असते.

**पर्याय :**

(1) कथन (a) बरोबर (b) चूक
(2) कथन (a) चूक (b) बरोबर
(3) कथन (a) व (b) दोन्ही चूक
(4) कथन (a) व (b) दोन्ही बरोबर

---

30. 2003 च्या राजीव गांधी मानव सेवा पुरस्कार प्राप्त श्रीमती अनिना जोसेफ म्यॅथ्यु कोणत्या कार्यासाठी प्रसिद्ध आहेत ?

(1) होम फॉर प्रिझनर्स चिल्ड्रन
(2) होम फॉर प्रॉस्टीट्युट चिल्ड्रन
(3) होम फॉर स्ट्रीट चिल्ड्रन
(4) होम फॉर देवदासी चिल्ड्रन

---

**कच्च्या कामासाठी जागा**

31. एक ग्रॅम स्निग्धापासून ________ ऊष्मांक मिळतात.

(1) 4 (2) 16 (3) 9 (4) 12

---

32. (a) कारक विकासासाठी वेदक इंद्रियांच्या क्षमतांमधील संघटन व स्नायूंच्या हालचालींवर नियंत्रण आवश्यक असते.

(b) मुलांमधील कारक विकासाचा क्रम अक्षानुवर्ती असतो.

वरीलपैकी कोणते विधान **बरोबर** आहे ?

(1) (a) आणि (b) दोन्ही बरोबर (2) (a) चुकीचे (b) बरोबर

(3) (a) बरोबर (b) चुकीचे (4) (a) आणि (b) दोन्ही चुकीचे

---

33. राज्य महिला धोरण 2014 नूसार संकटात सापडलेल्या महिलांसाठी केंद्र सरकारने सुचविलेल्या ________ क्रमांकाची हेल्पलाइन महिला व बालविकास विभागामार्फत राज्यभर सुरू करण्यात आली.

(1) 131 (2) 181 (3) 171 (4) 141

---

34. (a) जीवनसत्व 'क' च्या अभावामुळे ॲनोरेक्झीया हा रोग होतो.

(b) मुलांमध्ये रोज 20 ते 40 mg लोह आवश्यक असते.

वरीलपैकी कोणते विधान **बरोबर** आहे ?

(1) (a) बरोबर (b) चुकीचे (2) (a) चुकीचे (b) बरोबर

(3) (a) व (b) दोन्ही चुकीचे (4) (a) व (b) दोन्ही बरोबर

---

35. इंदीरा गांधी मातृत्व सहयोग योजने (IGMSY) अंतर्गत किती गर्भवती आणि दुग्धसर्जित मातांनी लाभ घेतला ?

(1) 11.00 लाख (2) 11.5 लाख (3) 12.0 लाख (4) 12.5 लाख

---

36. योग्य कथन ओळखा :

(a) 1969 साली दिल्लीमध्ये चालू असणाऱ्या बांधकामावर मोबाइल क्रेश सुरू झाले.

(b) 1948 साली फॅक्टरी ॲक्ट मुळे पाळणाघरे सुरू झाली.

**पर्यायी उत्तरे :**

(1) कथन (a) बरोबर (b) चुकीचे (2) कथन (b) बरोबर (a) चुकीचे

(3) कथन (a) व (b) दोन्ही बरोबर (4) कथन (b) व (a) दोन्ही चुकीचे

---

**कच्च्या कामासाठी जागा**

37. जन्मत: लहान मुलांच्या शरीरात एकूण ________ अस्थि (हाडे) असतात.

(1) 350 (2) 206 (3) 270 (4) 208

38. घटसर्प, धनुर्वात आणि डांग्या खोकला या तिन्हीची प्रतिबंधक लस कशी देतात ?

(1) तोंडावाटे (2) इंजेक्शनवाटे (3) गोळी देऊन (4) सिरप देऊन

39. जागतिक आरोग्य संघटनेच्या निकषानुसार मुलीचे व मुलाचे जन्मत: किती वजन आदर्श मानले जाते ?

(1) मुलीचे 3.200 मुलाचे 3.500 (2) मुलीचे 3.00 मुलाचे 3.100

(3) मुलीचे 3.100 मुलाचे 3.300 (4) मुलीचे 3.300 मुलाचे 3.600

40. अर्भकावस्थेतील मृत्युला कारणीभूत असणाऱ्या आजारांपैकी कोणता प्रमुख आजार आहे ?

(1) घटसर्प (2) कावीळ (3) डायरिया (जुलाब) (4) रात आंधळेपणा

41. 1 ते 2 वर्षाची मुले नकारार्थी अवस्थेत प्रवेश करून आपल्या वस्तु इतरांना देण्याचे नाकारते असे वागणे हे :

(1) योग्य विकासाचे पाऊल होय

(2) स्वत:चे व्यक्तित्व विकसित करणे

(3) दुसऱ्यांना आनंद देणे

(4) वरीलपैकी नाही

42. सामान्य प्रसुतीनंतर नवजात शीशूला मातेचे दुध ________ तासात द्यावे.

(1) $\frac{1}{2}$ तास (2) 1.00 तास (3) $1\frac{1}{2}$ तास (4) 2.00 तास

**कच्च्या कामासाठी जागा**

43. देवदासींसाठी बीज भांडवल योजनेअंतर्गत रू. 35,000/- पर्यंतचे कर्ज राष्ट्रीयकृत बँकेमार्फत किती टक्के दराने मिळू शकते ?

(1) प्रतिवर्ष 4% (2) प्रतिवर्ष 6% (3) प्रतिवर्ष 9% (4) प्रतिवर्ष 12%

---

44. भारतात स्वातंत्र्यापूर्वी कोणी किंडरगार्डन (बालोद्यान) शाळांची स्थापना केली ?

(a) पंडित जवाहरलाल नेहरूंनी (b) ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी

(c) डॉ. ॲनी बेझंट यांनी (d) डॉ. जे.पी. नाईक यांनी

**पर्यायी उत्तरे :**

(1) (c) (2) (d) (3) (b) (4) (a)

---

45. मुलांमध्ये निर्माण होणारे रोग व कमतरता यांची जुळणी करा :

| | **कमतरता** | | **रोग** |
|---|---|---|---|
| (a) | कार्बोदके | (i) | गॉयटर |
| (b) | थायामिन (Bi) | (ii) | स्कर्व्ही |
| (c) | जीवनसत्व क | (iii) | बेरीबेरी |
| (d) | आयोडीन | (iv) | मरॅसमस |

**पर्यायी उत्तरे :**

| | **(a)** | **(b)** | **(c)** | **(d)** |
|---|---|---|---|---|
| (1) | (ii) | (i) | (iii) | (iv) |
| (2) | (iii) | (iv) | (ii) | (i) |
| (3) | (iv) | (iii) | (ii) | (i) |
| (4) | (i) | (iv) | (iii) | (ii) |

---

46. राजीव गांधी किशोरवयीन मुलींच्या सक्षमीकरणाकरीता 'सबला' योजना देशातील किती निवडक गावांमध्ये कार्यान्वित करण्यात आली ?

(1) 203 (2) 204 (3) 205 (4) 206

---

**कच्च्या कामासाठी जागा**

47. पाच वर्षाखालील मुलांच्या मृत्यूस मुख्यत्वे कोणता रोग कारणीभूत आहे ?

(a) हिवताप आणि क्षय
(b) अतिसार
(c) पांडू रोग आणि क्षय
(d) गोवर आणि ताप

**पर्यायी उत्तरे :**

(1) (a) आणि (b) (2) फक्त (b) (3) (b) आणि (c) (4) (a) आणि (d)

---

48. योग्य कथन करा :

(a) मुलाने प्राप्त केलेल्या गुणांमुळे आणि फक्त अनुभवामुळे जे प्रगतीसूचक बदल होतात ते म्हणजे विकास.

(b) अनुवंश व वातावरण या घटकांचा विकासावर परिणाम दिसण्यासाठी परिपक्वन व अध्ययन या दोन प्रक्रिया आवश्यक असतात.

**पर्याय :**

(1) कथन (a) बरोबर (b) चुकीचे
(2) कथन (a) व (b) दोन्ही बरोबर
(3) कथन (a) व (b) दोन्ही चुकीचे
(4) कथन (a) चुकीचे (b) बरोबर

---

49. राजीव गांधी 'सबला' योजनेवर 2012-13 या वर्षाकरीता शासनाने एकूण रू. 503 कोटीचा निधी मंजूर केला. या योजनेचा लाभ __________ किशोरींना झाला.

(1) 85.76 लक्ष (2) 87.76 लक्ष (3) 88.76 लक्ष (4) 86.76 लक्ष

---

50. स्त्री शक्ती पुरस्काराची रक्कम किती आहे ?

(1) 1 लाख (2) 2 लाख (3) 3 लाख (4) 4 लाख

---

51. भारतामध्ये पहिले राष्ट्रीय बाल धोरण कोणत्या वर्षी जाहीर करण्यात आले होते ?

(1) 1974 (2) 2009 (3) 2002 (4) 2004

---

52. राष्ट्रीय बालहक्क संरक्षण आयोगाचे मुख्यालय कोठे आहे ?

(1) मुंबई (2) दिल्ली (3) बेंगलोर (4) कलकत्ता

---

**कच्च्या कामासाठी जागा**

53. सहस्त्र विकास उद्दिष्टांमध्ये (MDG) 1990 ते 2015 या कालावधीमध्ये बालमृत्यू दरामध्ये किती घट करून बालमृत्यु कमी करण्याचे उद्दिष्ट आहे ?

(1) 2/3 (2) 2/5 (3) 20 टक्के (4) 100 टक्के

54. सन 1882-83 या काळात बालविवाहाचा अभ्यास करून शासकीय नोकरीत अविवाहितांना प्राधान्य, बाल विवाह परिणामांचा समावेश पाठ्यपुस्तकीय अभ्यासक्रमात करणे, विवाहित विद्यार्थ्यांना विद्यापीठीय परिक्षेस अपात्र करणे या प्रमुख शिफारशी कोणी सुचविल्या ?

(1) गोविंद देवल (2) वासुकाका जोशी

(3) बेहरामजी मलबारी (4) गोपाळ गणेश आगरकर

55. बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण)अधिनियम, 2000 नुसार खालीलपैकी कोणती यंत्रणा संरक्षणाची गरज असलेल्या बालकांचे/विधी संघर्षग्रस्त बालकांचे शिक्षण, प्रशिक्षण, पुनर्वसन, समन्वय इ.साठी शासनाला सल्ला देते ?

(a) राज्य सल्लागार मंडळ (b) बाल न्याय मंडळ

(c) जिल्हा सल्लागार मंडळ (d) बाल कल्याण समिती

**पर्यायी उत्तरे :**

(1) फक्त (a) (2) फक्त (a) आणि (c)

(3) फक्त (b) आणि (d) (4) (a), (b), (c)आणि (d)

56. राज्य शासनाच्या संस्थांतर्गत सेवा पैकी बाल न्याय अधिनियम कक्षेबाहेरच्या संस्था कोणत्या/ती ?

(a) निरीक्षण गृह (b) बालगृह

(c) बालसदन (d) अनुरक्षण वसतिगृहे

**पर्यायी उत्तरे :**

(1) (a) आणि (b) (2) (c) आणि (d)

(3) फक्त (c) (4) (a), (b), (c) आणि (d)

57. वय वर्षे 6 ते 14 वर्षांच्या प्रत्येक बालकाला शिक्षणाची संधी उपलब्ध करून देणे हे प्रत्येक पालकाचे कर्तव्य आहे हे सांगणारे कलम कोणते ?

(1) कलम 51 क (ट) (2) कलम 50 (3) कलम 45 (4) कलम 24

**कच्च्या कामासाठी जागा**

58. हुंडा प्रतिबंधक कायदा, 1961 कलम 8 (ब) 4 नुसार राज्यस्तरीय हुंडा प्रतिबंधक सल्लागार समितीचे अध्यक्ष कोण असतात ?

(1) मंत्री, गृह, महाराष्ट्र राज्य
(2) मंत्री, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य
(3) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
(4) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र शासन

59. 1994 मध्ये महिला धोरण तयार करणारे देशातील पहिले राज्य कोणते ?

(1) राजस्थान (2) गुजरात (3) केरळ (4) महाराष्ट्र

60. 1924 मध्ये पुणे येथे 'कौटुंबिक उपासना मंडळाची' स्थापना कोणी केली ?

(1) महात्मा फुले
(2) महर्षी कर्वे
(3) महर्षी विठ्ठल रामजी शिंदे
(4) पंडिता रमाबाई

61. बाल कामगार (प्रतिबंध) कायदा, 1986 ने खालीलपैकी कशाची तरतुद केली आहे ?

(a) भाग (a) आणि भाग (b) मध्ये नमूद उद्योग व कार्यशाळात बाल कामगार ठेवण्यास/काम करण्यास परवानगी देण्यास प्रतिबंध.
(b) आस्थापनामध्ये सायं 7 ते स. 8 या काळात बालकामगारांना काम देऊ नये.
(c) आस्थापनात कामास परवानगी दिलेल्या बालकामगाराबाबत विहीत पद्धतीने नोंदवही ठेवणे.
(d) बालकामगारास 8 तासापेक्षा अधिक काम देण्यास मनाई.

**पर्यायी उत्तरे :**

(1) (a) (2) (b) (3) (a), (b), (c) (4) (d)

62. बालहक्क संरक्षण आयोगाची स्थापना कधी करण्यात आली ?

(1) 2005 या वर्षी (2) 2006 या वर्षी (3) 2007 या वर्षी (4) 2008 या वर्षी

63. संयुक्त राष्ट्र संघाने 1975 हे वर्ष कोणते वर्ष म्हणून जाहीर केले ?

(1) आंतरराष्ट्रीय शांतता वर्ष
(2) आंतरराष्ट्रीय बालक वर्ष
(3) आंतरराष्ट्रीय महिला वर्ष
(4) आंतरराष्ट्रीय युवा वर्ष

**कच्च्या कामासाठी जागा**

64. अनैतिक व्यापार (प्रतिबंध) कायदा, 1956 नुसार सात वर्षे ते दहा वर्षे वा आजीवन तुरुंगवासाची शिक्षा खालीलपैकी कोणत्या अपराधासाठी होईल ?

(a) 18 वर्षे पूर्ण झालेली व्यक्ती अज्ञान व्यक्तिच्या वेश्या व्यवसायाच्या उत्पन्नावर जगत असेल

(b) वेश्या व्यवसायासाठी व्यक्तीला फूस लावणे, घेऊन जाणे, पुरवणे

(c) वेश्या व्यवसायाच्या ठिकाणी व्यक्तीला डांबून ठेवणे

(d) जागा कुंटणखान्यासाठी वापरणे, व्यवस्था पाहणे/मदत करणे

**पर्यायी उत्तरे :**

(1) (a) फक्त (2) (b) फक्त (3) (a), (b), (c) (4) (d) फक्त

---

65. महाराष्ट्रात महिला धोरण 2001 नुसार महिला सक्षमीकरण समितीचे गठण केले गेले. तिचे अध्यक्ष कोण असतात ?

(1) मा. मंत्री, महिला व बाल विकास (2) मा. अध्यक्ष, राज्य महिला आयोग

(3) मा. संचालक, माविम (4) मा. मुख्यमंत्री

---

66. योग्य जोड्या जुळवा :

| | **संयुक्त राष्ट्रसंघाचा ठराव** | | **वर्ष** |
|---|---|---|---|
| (a) | महिलांचे राजकीय हक्क | (i) | 1967 |
| (b) | विवाहित महिलांचे राष्ट्रीयत्व | (ii) | 1962 |
| (c) | विवाह, किमान वय व नोंदणी | (iii) | 1957 |
| (d) | महिलां विरुध्द भेदभाव निर्मूलन | (iv) | 1952 |

**पर्यायी उत्तरे :**

| | **(a)** | **(b)** | **(c)** | **(d)** |
|---|---|---|---|---|
| (1) | (i) | (ii) | (iii) | (iv) |
| (2) | (iv) | (iii) | (ii) | (i) |
| (3) | (ii) | (i) | (iv) | (iii) |
| (4) | (iii) | (iv) | (i) | (ii) |

---

**कच्च्या कामासाठी जागा**

67. महाराष्ट्र राज्य महिला आयोगामधे अध्यक्षाशिवाय किती अशासकीय सदस्य असतात ?

(1) चार (2) पाच (3) सहा (4) आठ

---

68. कामाबाबत न्याय्य व मानवीय परिस्थिती आणि प्रसूती विषयक सहाय्याची तरतूद राज्य करेल असे निर्देश संविधानाच्या कोणत्या अनुच्छेदाद्वारे दिले आहेत ?

(1) अनुच्छेद 42 (2) अनुच्छेद 43 (3) अनुच्छेद 48 (4) अनुच्छेद 49

---

69. संयुक्त राष्ट्र संघाने 3 कलमी मानवी अधिकारांची घोषणा ज्या दिवशी केली तो दिवस म्हणजे :

(1) 12 डिसेंबर 1947 (2) 15 ऑगस्ट 1947

(3) 10 डिसेंबर 1948 (4) वरीलपैकी कोणताही दिवस नाही

---

70. बाल न्याय अधिनियम 2000 अंतर्गत विधी संघर्षग्रस्त बालकांसाठी राज्यात ठिकठिकाणी कोणती गृहे उभारण्यात आलेली आहेत ?

(1) बालगृहे (2) अनाथालये (3) विशेष गृहे (4) सेवा गृहे

---

71. जोड्या लावा :

| | कायदे | | वर्ष |
|---|---|---|---|
| (a) | बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिनियम | (i) | 1890 |
| (b) | लैंगिक अत्याचारापासून बालकांचे संरक्षण | (ii) | 2011 |
| (c) | केंद्रिय दत्तक संसाधन प्राधिकरणाची मार्गदर्शक तत्वे | (iii) | 2012 |
| (d) | पालक व पाल्य अधिनियम | (iv) | 2009 |

**पर्यायी उत्तरे :**

| | (a) | (b) | (c) | (d) |
|---|---|---|---|---|
| (1) | (iv) | (iii) | (ii) | (i) |
| (2) | (i) | (ii) | (iii) | (iv) |
| (3) | (iv) | (i) | (ii) | (iii) |
| (4) | (iii) | (i) | (ii) | (iv) |

---

**कच्च्या कामासाठी जागा**

72. खालीलपैकी कोणत्या योजनांचा आधार स्वयं सहाय्यता गट आहेत ?

(a) स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना (b) राष्ट्रीय सम विकास योजना

(c) महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजना (d) स्वयं सिध्दा कार्यक्रम

**पर्यायी उत्तरे :**

(1) फक्त (a) (2) फक्त (a), (b) आणि (c)

(3) (a), (b) आणि (d) (4) फक्त (d)

---

73. महात्मा फुले यांच्यावर थॉमसपेन यांच्या कोणत्या पुस्तकाचा प्रभाव दिसतो ?

(1) जस्टीस ऑफ पीस (2) रिलीफ ॲक्ट (3) राईट्स ऑफ मॅन (4) हू वेअर शुद्राज

---

74. महाराष्ट्र राज्य महिला आयोगाचे अध्यक्ष व अशासकीय सदस्यांचा कार्यकाळ किती असतो ?

(1) तीन वर्ष (2) पाच वर्ष

(3) सहा वर्ष (4) वरीलपैकी एकही नाही

---

75. भारतीय दंड विधान कलम 377 कशाशी संबंधित आहे ?

(1) मातृत्व सहयोग (2) जम्मू आणि काश्मिर

(3) तृतीय पंथी (4) बालकांच्या शोषणा संबंधी

---

76. स्थानिक स्वराज संस्थांमध्ये महिलांना आरक्षण देण्याची तरतूद करणारी संविधान सुधारणा( त्र्याहत्तरावी सुधारणा) कोणत्या वर्षात करण्यात आली ?

(1) 1961 (2) 1971 (3) 1992 (4) 2005

---

77. अनैतिक व्यापारात अडकलेल्या महिलांचे पुनर्वसन, या व्यवसायात येण्यास प्रतिबंध, जनजागृती करणे, त्यांना नातेवाईकांच्या ताब्यात देणे, अन्न, वस्त्र, निवारा, वैद्यकीय सुविधा, कायदेविषयक सल्ला या करिता केंद्रशासनाची पुढीलपैकी कोणती योजना कार्यान्वीत आहे ?

(1) स्टेप (2) उज्वला (3) स्वाधार (4) कामधेनु

---

कच्च्या कामासाठी जागा

78. धोकादायक व्यवसायात 14 वर्षाखालील बाल कामगारास प्रतिबंध करणारे राज्यघटनेतील कलम कोणते ?

(1) कलम 24 (2) कलम 15 (3) (3) कलम 45 (4) कलम 51

79. सहस्त्र विकास उद्दिष्टे कार्यक्रम 2013 च्या अहवालानुसार बिगर शेती वेतन देय नोकरी मध्ये 100 पैकी किती महिला कार्यरत आहेत ?

(1) 28 (2) 40 (3) 16 (4) 55

80. महाराष्ट्र राज्य महिला आयोगाचे पदसिध्द सदस्य कोण असतात ?

(1) मुख्य सचिव, मंत्रालय म.राज्य

(2) सचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय म.राज्य

(3) आयुक्त, महिला व बालविकास म. राज्य

(4) पोलीस महासंचालक म. राज्य

81. शासन आणि नागरी समाज (Civil Society) भागीदारीची बाल विकासाची योजना कोणती ?

(a) एकात्मिक बाल विकास योजना
(b) एकात्मिक बाल संरक्षण योजना (ICPS)
(c) सबला योजना
(d) पाळणाघर योजना

**पर्यायी उत्तरे :**

(1) फक्त (a) (2) फक्त (b)

(3) फक्त (c) (4) (a), (b), (c) आणि (d)

82. जोड्या लावा :

| कायदा | अमलात आलेले वर्ष |
|---|---|
| (a) बालक (श्रम मागणी) अधिनियम | (i) 1986 |
| (b) पालक आणि बालक अधिनियम | (ii) 1933 |
| (c) बाल विवाह प्रतिबंध अधिनियम | (iii) 1890 |
| (d) बाल कामगार (प्रतिबंध आणि नियमन) | (iv) 1929 |

**पर्यायी उत्तरे :**

| | (a) | (b) | (c) | (d) |
|---|---|---|---|---|
| (1) | (iv) | (i) | (ii) | (iii) |
| (2) | (iii) | (i) | (iv) | (ii) |
| (3) | (ii) | (iii) | (iv) | (i) |
| (4) | (iv) | (ii) | (i) | (iii) |

**कच्च्या कामासाठी जागा**

83. खालीलपैकी कोणती योजना केंद्र शासन पुरस्कृत आहे ?

(a) कामधेनु योजना 2001

(b) स्वयं सिध्दा 2001-02

(c) आदिवासी क्षेत्रासाठी मातृत्व अनुदान योजना

(d) अहिल्याबाई होळकर मोफत एस.टी. प्रवास योजना

**पर्यायी उत्तरे :**

(1) (a) फक्त (2) (b) फक्त

(3) (c) फक्त (4) (a), (c) आणि (d) फक्त

---

84. बाल न्याय अधिनियम 2000 (मुलांची काळजी व संरक्षण) च्या संदर्भात खालीलपैकी कोणते विधान चुकीचे आहे ?

(a) बाल न्याय मंडळ 18 वर्षे पेक्षा कमी वयाच्या दोषी बाबत न्यायिक कार्य करते.

(b) बाल न्याय मंडळामध्ये एक प्रथम वर्ग न्यायिक दंडाधिकारी व दोन सामाजिक कार्यकर्ते (पैकी एक महिला) असतात.

(c) मंडळाची बैठक नसेल तर बाल अपराधीस कोणत्याही एका सदस्या समोर हजर करता येईल.

(d) बाल न्याय मंडळाचे संबंधित क्षेत्रासाठी स्थापना झाली नसेल तर सत्र व जिल्हा न्यायालय/उच्च न्यायालय कलम 6 (2) नुसार सक्षम असेल.

**पर्यायी उत्तरे :**

(1) (a) (2) (b) (3) (a), (b), (c) (4) (d)

---

85. दिवंगत लताताई सकट यांच्या नावाने राज्यस्तरीय पुरस्कार पुढीलपैकी कोणत्या क्षेत्रात काम करणाऱ्या संस्थांना देण्यात येतो ?

(1) बाल कल्याण (2) अपंग कल्याण (3) देवदासी कल्याण (4) आदिवासी कल्याण

---

86. सन 2011 च्या संयुक्त राष्ट्र संघाच्या अहवालाच्या आकडेवारीनुसार सर्वात जास्त बालमृत्यू कोणत्या देशात झाले ?

(1) भारत (2) चीन (3) कांगो (4) पाकिस्तान

---

**कच्च्या कामासाठी जागा**

87. अनाथ, निराश्रीय, निराधार, बेघर, संरक्षण व निवाऱ्याची गरज असलेल्या मुला मुलींना संस्थेत दाखल करण्याऐवजी पर्यायी कुटुंब उपलब्ध करून देणे व संस्थेतील वातावरणाऐवजी कौटुंबिक वातावरणात त्याचे संगोपन व विकास घडवुन आणण्याचा खालीलपैकी कोणत्या योजनेचा उद्देश आहे ?

(1) अनुरक्षण योजना (After care) (2) दत्तक योजना

(3) बाल संगोपन योजना (Foster care) (4) सर्वसाधारण अनुदान योजना

---

88. महिलांना घरगुती हिंसाचार, कामाच्या ठिकाणी लैंगिक छळ, घटस्फोट इ. बाबत सेवा पुरविणारे राज्य महिला आयोगाचे अधिकारी कोणते ?

(a) समुपदेशक-नि-प्रकल्प अधिकारी (b) विधी तज्ञ

(c) सदस्य सचिव (d) उपसचिव

**पर्यायी उत्तरे :**

(1) फक्त (a) आणि (b) (2) फक्त (b) आणि (c)

(3) फक्त (c) आणि (d) (4) (a), (b), (c) आणि (d)

---

89. मुलांच्या कल्याणासाठी विशेषत: शारीरिक, मानसिकदृष्ट्या अपंगत्व असलेल्या मुलांच्या कल्याणासाठी कोणत्याही प्रकारचे वेतन अथवा मानधन न घेता मानवसेवी उदात्त भावनेतून सलग किमान 10 वर्षे वैशिष्ट्यपूर्ण अद्वितीय काम करणाऱ्या व्यक्तीस केंद्रशासनामार्फत खालीलपैकी कोणता पुरस्कार प्रदान करण्यात येतो ?

(1) राष्ट्रीय बाल कल्याण पुरस्कार (2) पंडित जवाहरलाल नेहरू पुरस्कार

(3) राजीव गांधी मानव सेवा पुरस्कार (4) राष्ट्रीय बाल पुरस्कार

---

90. हुंडा प्रतिबंध अधिनियम, 1961 नुसार कोणत्याही व्यक्तीने हुंडा दिला/घेतला किंवा तो देण्यास अथवा घेण्यास अपप्रेरणा दिली तर ती व्यक्ती कोणत्या शिक्षेस पात्र होईल ?

(1) हुंडा देणे/घेणे प्रथा असल्याने शिक्षेस पात्र होणार नाही

(2) तीन महिने कारावास व दंड

(3) किमान पाच वर्षे कारावास व किमान पंधरा हजार रुपये दंड

(4) एक वर्ष कारावास व एक हजार रूपये दंड

---

**कच्च्या कामासाठी जागा**

91. संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या निराधार व निराश्रित मुलांकरीता बालकाश्रम या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी शासन व स्वयंसेवी संस्था यांच्या खर्चाचे प्रमाण किती असते ?

(a) 90% राज्य शासन व 10% स्वयंसेवी संस्था (द.म.द.शे.रू. 250)

(b) द.म.द.शे. रू. 450 + इतके परिरक्षण अनुदान व रू.50 इमारत भाडे, औषधे प्रसाधन साहित्य इ.साठी

(c) 50% राज्य शासन, 25% केंद्रशासन व 25% स्वयंसेवी संस्था

(d) 100% केंद्र शासन

**पर्यायी उत्तरे :**

(1) फक्त (a) आणि (b) (2) फक्त (a) (3) फक्त (c) (4) फक्त (d)

---

92. सामाजिक अत्याचारास बळी ठरलेल्या बालविधवासाठी बालहत्या प्रतिबंधक गृह चालविणाऱ्या महाराष्ट्रातील आधुनिक स्त्री सुधारक कोण ?

(1) रमाबाई रानडे (2) पंडिता रमाबाई (3) डॉ.आनंदीबाई जोशी (4) सावित्रीबाई फुले

---

93. माणसांचा अपव्यापार आणि वेठबिगारी तसेच बालकांना कामावर ठेवण्यास मनाई संविधानाच्या कोणत्या अनुच्छेदात करण्यात आली आहे ?

(1) अनुच्छेद 15 (2) अनुच्छेद 17 व 18 (3) अनुच्छेद 19 (4) अनुच्छेद 23 व 24

---

94. महाराष्ट्र राज्य महिला आयोगाची स्थापना कोणत्या वर्षी करण्यात आली ?

(1) 1992 (2) 1993 (3) 1994 (4) 1995

---

95. 1992 मध्ये स्थापन केलेल्या जिल्हा महिला व बाल कल्याण समितीला वैधानिक स्वरूप असून तिचे प्रशासनिक प्रमुख कोण असतात ?

(1) बाल विकास प्रकल्प अधिकारी

(2) मुख्य कार्यकारी अधिकारी (CEO) जिल्हा परिषद

(3) पालक मंत्री

(4) अध्यक्ष, जिल्हा परिषद

---

96. महाराष्ट्रातील कोणत्या दोन समाजसुधारकांनी हंटर कमिशन पुढे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण सक्तीचे करावे आणि स्त्री शिक्षणासाठी आग्रह धरला ?

(1) महात्मा ज्योतिबा फुले, पंडिता रमाबाई (2) पंडिता रमाबाई, रमाबाई रानडे

(3) महात्मा ज्योतिबा, रमाबाई रानडे (4) महात्मा ज्योतिबा फुले, सावित्रीबाई फुले

---

**कच्च्या कामासाठी जागा**

97. लॉर्ड साऊथबरो यांच्या अध्यक्षतेखालील 'मतदान कमिटी' मध्ये सरकार ने कोणाची निवड केली ?

(1) वि.रा.शिंदे

(2) डॉ.बाबासाहेब आंबेडकर

(3) वि.रा.शिंदे आणि डॉ.बाबासाहेब आंबेडकर

(4) गोपाळकृष्ण गोखले

98. राष्ट्रीय बाल पुरस्कार (अपवादात्मक यशासाठी) 1996 नुसार एक सुवर्ण व 35 रौप्य पदके दिली जातात (अनुक्रमे रू. 20 हजार व रू. 10 हजार) त्यासाठी वयोमर्यादा कोणती ?

(1) 18 वर्षे पर्यंत (2) 14 वर्षे पर्यंत

(3) 4 ते 15 वर्षे पर्यंत (4) 10 ते 15 वर्षे पर्यंत

99. एकात्मिक बाल विकास सेवा योजना नागरी प्रकल्प या योजना अंमलबजावणीतील शेवटच्या पदाचे नाव काय आहे ?

(1) पर्यवेक्षिका (2) अंगणवाडी सेविका

(3) मिनी अंगणवाडी सेविका (4) मदतनीस

100. बालकांना निकोप, मुक्त आणि प्रतिष्ठेच्या वातावरणात विकास होण्याची संधी आणि सुविधा दिल्या जातील तसेच बालकांचा आणि युवकांचा शोषणापासून व नैतिक अध:पतनापासून बचाव केला जाईल हे राज्यघटनेच्या कोणत्या कलमांतर्गत सांगितले आहे ?

(1) कलम 24 (2) कलम 39 च (3) कलम 45 (4) कलम 23

-oOo-

कच्च्या कामासाठी जागा

## सूचना — ( पृष्ठ 1 वरून पुढे.... )

(8) प्रश्नपुस्तिकेमध्ये विहित केलेल्या विशिष्ट जागीच कच्चे काम (रफ वर्क) करावे. प्रश्नपुस्तिकेव्यतिरिक्त उत्तरपत्रिकेवर वा इतर कागदावर कच्चे काम केल्यास ते कॉपी करण्याच्या उद्देशाने केले आहे, असे मानले जाईल व त्यानुसार उमेदवारावर शासनाने जारी केलेल्या ''परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचे अधिनियम-82'' यातील तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.

(9) सदर प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपल्यानंतर उमेदवाराला ही प्रश्नपुस्तिका स्वत:बरोबर परीक्षाकक्षाबाहेर घेऊन जाण्यास परवानगी आहे. **मात्र परीक्षा कक्षाबाहेर जाण्यापूर्वी उमेदवाराने आपल्या उत्तरपत्रिकेचा भाग-1 समवेक्षकाकडे न विसरता परत करणे आवश्यक आहे.**

---

## नमुना प्रश्न

प्रश्न क्र. **201.** आधुनिक विचारसरणीनुसार शिक्षणाच्या प्रक्रियेतील केंद्रबिंदू कोण ?

(1) शिक्षण संस्था (2) शिक्षक

(3) विद्यार्थी (4) अभ्यासक्रम

ह्या प्रश्नाचे योग्य उत्तर ''(3) विद्यार्थी'' असे आहे. त्यामुळे या प्रश्नाचे उत्तर ''(3)'' होईल, यास्तव खालीलप्रमाणे प्रश्न क्र. 201 समोरील उत्तर-क्रमांक ''③'' हे वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखविणे आवश्यक आहे.

प्र. क्र. **201.** ① ② ● ④

अशा पद्धतीने प्रस्तुत प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाचा तुमचा उत्तरक्रमांक हा तुम्हाला स्वतंत्ररीत्या पुरविलेल्या उत्तरपत्रिकेवरील त्या त्या प्रश्नक्रमांकासमोरील संबंधित वर्तुळ पूर्णपणे छायांकित करून दाखवावा. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

SEAL

---

**कच्च्या कामासाठी जागा /SPACE FOR ROUGH WORK**